सन २०१५-१६ या वित्तिय वर्षात पुनर्वसन तत्त्वावरील स्वयंसेवी संस्थांना सहायक अनुदान वितरित करणेबाबत..

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः कुनिका २०१५/प्र क्र ३७३ /आरोग्य -५

मंत्रालय, मुंबई ४०००३२.
तारीख: ३० सप्टेंबर, २०१५

**वाचा :**

१) सह संचालक, आरोग्य सेवा, (क्षय व कुष्ठ), पुणे यांचे क्र. ससंआसे/कुष्ठ व क्षय/ कक्ष-१०२/२५३२१-२२/२०१५, दिनांक १६/७/२०१५.व २७६५१-५२/२०१५, दि.६/८/२०१५.

२) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांकः कुनिका२०११/प्र क्र ३२१/आरोग्य -५, दिनांक २१ मार्च, २०१२

३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दिनांक १७ एप्रिल, २०१५.

**प्रस्तावना :**

उपरोक्त संदर्भाधीन अनुक्रमांक-२ येथील शासन निर्णयानुसार पुनर्वसन तत्त्वावरील कुष्ठरुग्णांसाठी रु.२,०००/- प्रमाणे प्रतीरुग्ण व दरमहा संस्थेने प्रत्यक्ष भरती केलेल्या रुग्णांप्रमाणे अनुदान देण्यात येते. याकरीता सन २०१५-१६ या वित्तिय वर्षाकरीता पुनर्वसन तत्त्वावरील स्वयंसेवी संस्थांना सहायक अनुदान देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

पुनर्वसन तत्त्वावरील स्वयंसेवी संस्थांना सहायक अनुदाने देण्यासाठी ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दिष्टाखाली रु.२४८.०० लक्ष इतके सहायक अनुदान (योजनेतर) सन २०१५-१६ या वर्षाकरीता अर्थसंकल्पित करण्यात आले आहे. सदर अनुदानातून खाली दर्शविल्याप्रमाणे स्वयंसेवी संस्थांना एकूण रु.७५,६३,७३१/- (रुपये पंच्याहत्तर लक्ष त्रेसष्ठ हजार सातशे एकतीस फक्त) इतके सहायक अनुदान दिनांक २१ मार्च, २०१२ च्या शासन निर्णयातील अटींच्या पूर्ततेच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

| .अ.क्र. | संस्थेचे नाव | कालावधी | प्रत्यक्ष हजर रुग्ण | देय अनुदान |
|---|---|---|---|---|
| १ | महारोगी सेवा समिती, आनंदवन, वरोरा, जि.चंद्रपूर | जानेवारी २०१५ ते मार्च २०१५ | १८०० | रु.३६,००,०००/- |
| २ | महात्मा गांधी शिक्षण संस्था चावर्दा जि.बुलढाणा | ऑगस्ट २०१४ ते मार्च २०१५ | ३२० | रु.६,३७,१०८/- |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ३ | सरावली वेलफेअर बचत सेंटर जि.ठाणे | एप्रिल २०१४ ते मार्च २०१५ | २४ | रु.५२,७३३/- |
| ४ | गुरुदेव कुष्ठसेवा मंदीर आमला विश्वेश्वर, जि.अमरावती | जुलै २०१४ ते मार्च २०१५ | ६६ | रु.१,२८,९००/- |
| ५ | विदर्भ महारोगी सेवा मंडळ, तपोवन जि.अमरावती | जुलै २०१४ ते मार्च २०१५ | १०३९ | रु.१८,६०,२९८/- |
| ६ | महारोगी आश्रम काशीखेड जि.अमरावती | एप्रिल २०१३ ते मार्च २०१४ | १२ | रु.२२,८९८/- |
| | | एप्रिल २०१४ ते मार्च २०१५ | ९१ | रु.१,५०,८३९/- |
| ७ | कुष्ठरोग पुनर्वसन केंद्र गोरापूर वडाळा मिशन जि.अहमदनगर | ऑक्टोबर २०१४ ते डिसेंबर २०१४ | १०७ | रु.१,३७,२९४/- |
| ८ | आनंदग्राम सोसायटी, डुडुळगाव आळंदी, जि.पुणे | ऑक्टोबर २०१४ ते मार्च २०१४ | १७३ | रु.३,१५,६१८/- |
| ९ | महारोगी सेवा समिती दत्तपूर, वर्धा | जानेवारी २०१५ ते मार्च २०१५ | १७७ | रु.३,५०,८९३/- |
| १० | कुष्ठरोग निवारण समिती शांतीवन नेरे जि.रायगड | डिसेंबर २०१४ ते मार्च २०१५ | १६० | रु.३,०७,१५०/- |
| | एकूण | | ३९६९ | रु.७५,६३,७३१/- |

२. सहसंचालक (क्षय व कुष्ठ), पुणे यांनी वरील अटी पूर्ण केल्याची खातरजमा करुन संबंधित संस्थांना अनुदान अदा करण्याची कार्यवाही करावी.

३. याबाबतचा खर्च मागणी क्र.आर-१, २२१०, वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य (०१)(१८) कुष्ठरोग मुक्त झालेल्या रोग्यांना पुनर्वसनासाठी अनुदान (२२१० ०७४ ५), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. सदर आदेश वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.अर्थसं २०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये त्या विभागाने प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकाराच्या अधिन राहून त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९२९१२२४०९१५१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jayshree Suresh Jadhav

Digitally signed by Jayshree Suresh Jadhav
DN: CN = Jayshree Suresh Jadhav, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Desk Officer
Date: 2015.10.01 14:35:50 +05'30'

(ज. सु. जाधव)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१)महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखावअनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा), मुंबई.
२)जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४)निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
५)संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
६)सहसंचालक, आरोग्य सेवा (कुष्ठ व क्षय), पुणे
७)सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई.
८)वित्तविभाग, (व्यय.१३) मंत्रालय, मुंबई
९)सार्वजनिक आरोग्य विभाग, (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई
१०)निवडनस्ती (आरोग्य-५)